20110114152554001

**पिंपरी चिंचवड महानगरपालिका**

महानगरपालिका आस्थापनेवर "सह शहर अभियंता" या अभिनामाचे एक पद नव्याने निर्माण करण्यास आणि यापूर्वी मंजूर पदाचे पदनाम बदलण्यास मान्यता देण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
नगर विकास विभाग
शासन निर्णय क्र. पीसीसी ३०१०/२२५/प्र.क्र. ६६ /नवि २२
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२
दिनांक- ७ जून, २०१०

**वाचा :-** १) आयुक्त, पिंपरी चिचवड महानगरपालिका यांचे पत्र क्र. प्रशा/१अ/ कावि/ १०७/२०१०, दि. ८.०२.२०१० वत्यासोबतचा मनपा ठराव क्र. ६१२, दिनांक २०.२.२००९ सोबतचे परिशिष्ट अ व सहपत्रे
२) आयुक्त, पिंपरी चिचवड महानगरपालिका यांचे पत्र क्र. प्रशा/ १अ/ कावि/ ३२२/ २०१०, दि. २०.०४.२०१०
३) या विभागाचे पत्र क्र. पीसीसी ३००८/११०१/प्र.क्र.३७१/०८/नवि-२२ दि. २१.११.२००८.
४) या विभागाचे पत्र क्र. पीसीसी ३००८/११००/प्र.क्र.३७२/०८/नवि-२२ दि. १३.०४.२०१०.

**प्रस्तावना-**

पिंपरी-चिंचवड शहरातील आरोग्य, स्थापत्य विभागाकडील विकास कामाची वाढती व्याप्ती आणि केंद्र सरकार व राज्य सरकारचे सहकार्याने जे.एन.एन.यु.आर.एम. योजनेअंतर्गत हाती घेतलेल्या विकास कामामुळे पायाभुत सोयीसुविधाविषयक कामात मोठया प्रमाणात वाढलेली आहे. सध्या महानगरपालिका निधी व जे.एन.एन.यु.आर.एम. योजनेअंतर्गत केंद्र/राज्य शासन यांच्यामार्फत उपलब्ध अनुदानातून करावयाच्या प्रकल्पविषयक कामकाजात अंदाजे सहा पटीने खर्चात वाढ झालेली आहे. सदर कामे विहित मुदतीत पूर्ण करणे आवश्यक आहे. त्याचप्रमाणे महानगरपालिकेची स्थापत्य विभागाकडील विकास कामाकरिता नियमितपणे मोठया प्रमाणावर तरतूद करण्यात येते. सदर तरतूदीनुसार आर्थिक वर्षात सदर कामे तातडीने पूर्ण करणे आवश्यक आहे. त्याकरिता चालू कामांचे नियोजन व देखभाल याकरिता सक्षम अधिकारी असणे आवश्यक आहे. महानगरपालिकेच्या आस्थापनेवर सध्या स्थापत्य विभागासाठी शहर अभियंता आणि अतिरिक्त शहर अभियंता व अतिरिक्त अधिक्षक अभियंता या अभिनामाची मंजूर पदे आहेत. तसेच विद्युत व यांत्रिक विभागासाठी सह शहर अभियंता आणि विकास अभियंता या अभिनामाचे पद मंजूर आहेत. महानगरपालिकेच्या क्षेत्रातील विकास कामाचे नियोजन व प्रशासकिय कामाची सुसूत्रता यासाठी महानगरपालिकेच्या आस्थापनेवर सध्या कार्यरत असणारे अतिरिक्त शहर अभियंता यांचे समकक्ष

व त्याच वेतनश्रेणीत एक पद नव्याने निर्माण करुन, तसेच पूर्वीच्या मंजूर पदांच्या पदनामात सुसुत्रता आणुन साधर्म्य ठेवण्यासाठी पदनामात दुरुस्ती करुन प्रशासकीय दृष्ट्या बदल करणे अनिवार्य झालेले आहे.

उपरोक्त परिस्थिती आणि महानगरपालिका ठरावानुषंगाने आयुक्त, पिंपरी चिंचवड शहर महानगरपालिका यांनी संदर्भाधीन पत्रान्वये खालीलप्रमाणे प्रस्ताव शासनास सादर केला आहे:-

१) महानगरपालिका आस्थापनेवरील मंजूर "अतिरिक्त शहर अभियंता (पाणी पुरवठा) व अति. अधिक्षक अभियंता (स्थापत्य)" या दोन्ही संवर्गासाठी असलेला एकच निम्नस्तराचे पदाचा संवर्ग (फिडर कॅडर) विचारात घेता या पदांच्या पदनामात साधर्म्य व सुसूत्रता राहण्यासाठी या दोन्ही पदांचे पदनाम सह शहर अभियंता (स्थापत्य) असे सुधारित करणे.

२) महानगरपालिका आस्थापनेवर "सह शहर अभियंता" (स्थापत्य) या संवर्गात रु. १२०००-३७५-१६५०० या वेतनश्रेणीतील परिशिष्ट अ मधील अर्हतेत एक पद नव्याने निर्माण करण्यास मान्यता देणे.

३) शहर अभियंता या पदाची श्रेणीवाढ करुन या पदास रु. १६४००- २०९०० अशी वेतनश्रेणी लागू करण्यास शासनाची मान्यता देणे.

सबब आयुक्त, पिंपरी चिंचवड महानगरपालिका पिंपरी, पुणे यांनी उपरोक्त नमूद बाबींसाठी संदर्भाधीन पत्रान्वये सादर केलेला प्रस्ताव, महानगरपालिका ठराव, या महानगरपालिकेतील यापूर्वी अभियांत्रिकी संवर्गासाठी मंजूर पदांची पदसोपान परंपरा/अधिकार श्रेणी (Hierarchy) तसेच या महानगरपालिकेतील विकास कामांची व्याप्ती आणि आस्थापना खर्चाची टक्केवारी विचारात घेवून, आयुक्तांनी सादर केलेला उपरोक्त नमूद प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

**शासन निर्णय-**

आयुक्त, पिंपरी-चिंचवड शहर महानगरपालिका यांनी सादर केलेला प्रस्ताव विचारात घेवून, पिंपरी-चिंचवड शहर महानगरपालिकेच्या आस्थापनेवरील मंजूर "**अतिरिक्त शहर अभियंता (पाणी पुरवठा)** व **अति. अधिक्षक अभियंता (स्थापत्य)**" या दोन्ही संवर्गातील पदांचे पदनामात प्रशासकियदृष्ट्या साधर्म्य व सुसूत्रता राहण्यासाठी, या पदांचे पदनाम "**सह शहर अभियंता (स्थापत्य)** " असे सुधारीत करण्यास आणि "**सह शहर अभियंता (स्थापत्य)**" या अभिनामाचे एक पद सोबतच्या परिशिष्ट- अ मधील पात्रता व अर्हतेत नव्याने निर्माण करण्यास मुंबई प्रांतिक महानगरपालिका अधिनियम,१९४९ चे कलम -५१ कलम - ३७३ (३), व ४५५ अन्वये प्राप्त अधिकारात खालील अटींच्या अधिन राहून याआदेशाद्वारे शासनाची मान्यता देण्यात येत आहे.

०२.  " शहर अभियंता " या पदावर शासनाच्या सार्वजनिक बांधकाम विभागाच्या मुख्य अभियंता संवर्गातील अधिकारी प्रतिनियुक्तीने नियुक्त असल्याने मनपा आस्थापनेवर मंजूर शहर अभियंता या पदाची श्रेणीवाढ करण्याचा प्रस्ताव अमान्य करण्यात येत आहे.

०३. आयुक्त, पिंपरी-चिंचवड शहर महानगरपालिका यांनी संदर्भाधीन क्र. २ येथील पत्रात नमूद केल्याप्रमाणे महानगरपालिकेच्या पाणी पुरवठा विभागासाठी स्वतंत्र यंत्रणा निर्माण करुन कप्पेबंद पध्दती (Water tight compartment ) ची अंमलबजावणी करावी.

०४.  शासनाने महानगरपालिकेस दि. २ जूलै, २००८ च्या शासन परिपत्रकान्वये पाठविलेले प्रारुप सेवाप्रवेश नियम सदर परिपत्रकात विहित केलेल्या कार्यपध्दतीनुसार तातडीने अंतिम करुन शासनास मान्यतेसाठी सादर करण्यात यावेत.

०५.  सदरील आदेशानुषंगाने आयुक्त, पिंपरी-चिंचवड शहर महानगरपालिका यांनी सर्व संविधानिक बाबीची पूर्तता करावी.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

( सुनिल कोठेकर )
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

प्रति,

१) मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई ३२.
२) सचिव, (२) (नवि), यांचे स्वीय सहायक, नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई ३२.
३) आयुक्त, पिंपरी चिंचवड शहर महानगरपालिका,पिंपरी, पुणे.
४) शहर अभियंता, पिंपरी चिंचवड शहर महानगरपालिका,पिंपरी, पुणे.
५) सहायक आयुक्त, (प्रशासन)पिंपरी चिंचवड शहर महानगरपालिका,पिंपरी, पुणे.
६) कक्ष अधिकारी (संगणक शाखा), नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई- ३२
७) निवडनस्ती, नवि २२

## परिशिष्ट अ

**पिंपरी चिंचवड शहर महानगरपालिकेच्या आस्थापनेवर निर्माण करावयाच्या "सह शहर अभियंता" या पदाची शैक्षणिक अर्हता**

(शासन निर्णय क्र. पीसीसी ३०१०/२२५/प्र.क्र. ६६ /नवि २२ दिनांक -७ जून, २०१० सोबतचे परिशिष्ट'अ')

| पदाचे नांव/श्रेणी | नेमणुकीची पध्दती | सह शहर अभियंता (स्थापत्य) या पदाची शैक्षणिक अर्हता | भरतीचे प्रमाण |
|---|---|---|---|
| सह शहर अभियंता (स्थापत्य) वेतनश्रेणी १२०००-३७५-१६५०० (पाचव्या वेतन आयोगाप्रमाणे) श्रेणी-१ | सरळसेवा | १. उमेदवाराचे वय ३५ वर्षापेक्षा जास्त नसावे<br>२) मान्यता प्राप्त विद्यापीठाची स्थापत्य अभियांत्रिकी विषयाची पदवी (बी,ई. सिव्हील)<br>३) स्थानिक स्वराज्य संस्था अथवा शासन मान्य संस्थेकडील कार्यकारी अभियंता या पदावर किमान १० वर्षाचा अनुभव | १००% पदोन्नती |
| | पदोन्नती | १) मान्यता प्राप्त विद्यापीठाची स्थापत्य अभियांत्रिकी शाखेची पदवी/पदविका (बी,ई. सिव्हील/डी.सी.ई.)<br>२) कार्यकारी अभियंता या पदावरील कामकाजाचा पदवीधारक असल्यास ७ वर्षे व पदविधारक असल्यास किमान १० वर्षाचा अनुभव | |

( सुनिल कोठेकर )
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन